आदेश क्र.७

रोख रकमेत देय अनुदान

१००% केंद्र पुरस्कृत मागास क्षेत्र अनुदान निधी (बीआरजीएफ) योजनेतंर्गत सन २०११-१२ याआर्थिकवर्षाच्या जिल्हा आराखडयातील औरंगाबाद,यवतमाळ,गडचिरोली या जिल्हयांना मंजूर विकास निधीचा प्रथम हप्ता अनुदान वितरीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन,**
**ग्राम विकास व जलसंधारण विभाग,**
**मादाम कामा रोड,हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२**
**शासन निर्णय क्रमांक : बीआरजीएफ-२०११/प्र.क्र.९४/पंरा-६**
**दिनांक - ४ नोव्हेंबर, २०११**

**प्रस्तावना** :

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) ही १००% केंद्र पुरस्कृत अनुदानाची योजना सन २००७-०८ पासून पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांचेमार्फत सुरू करण्यात आली आहे. राज्यामध्ये या योजनेच्या अंमलबजावणीकरीता केंद्र शासनामार्फत राज्यातील १२ जिल्हयांची निवड करण्यात आली आहे. त्यांची नावे पुढीलप्रमाणे . १) गडचिरोली २) भंडारा ३)चंद्रपूर ४) गोंदिया ५) नांदेड ६) हिंगोली ७) धुळे ८) नंदूरबार ९) अहमदनगर १०) यवतमाळ ११) औरंगाबाद १२) अमरावती

मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) या योजनेचा मुख्य उद्देश प्रादेशिक असमतोल दूर करणे व स्थानिक पायाभूत सुविधामधील कच्चे दुवे जोडणे हा आहे. तसेच योजनेच्या माध्यमातून पंचायत व नगरपालिका स्तरावरील स्थानिक प्रशासनास बळकटी देण्यासाठी वेगवेगळया सुविधा उपलब्ध करणे व याद्वारे या संस्थाची क्षमताबांधणी करणे हा आहे.

केंद्र शासनाने निर्गमित केलेल्या या योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार जिल्हयाचा विकास दृष्टीकोन (Vision Document) विचारात घेऊन लोकसहभाग प्रणाली मार्फत Particatory Rural Appraisal (PRA) गावआराखडा तयार करणे आवश्यक आहे. गाव आराखडयाचे पंचायत समितीद्वारे एकत्रीकरण करून जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणेमार्फत जिल्हा आराखडा तयार

करण्यात येतो. तद्नंतर जिल्हा आराखडयास जिल्हा स्तरावर जिल्हा नियोजन समितीची (DPC) मंजुरी घेऊन सदर आराखडे राज्य स्तरावर उच्चाधिकार समितीच्या अवलोकनार्थ सादर करण्यात येतात.

त्यानंतर सदर आराखडे केंद्र शासनास सादर केले जातात. केंद्र शासन या आराखडयाच्या अनुषंगाने संबंधीत जिल्हयास निधी मंजूर करते. केंद्र शासनाने मंजूर केलेल्या निधीतून वरील १२ जिल्हयात मंजूर आराखडयानुसार जिल्हा विकासाची कामे हाती घेण्यात येतात.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने प्राप्त जिल्हा विकास आराखडयाच्या अनुषंगाने राज्यातील औरंगाबाद, यवतमाळ व गडचिरोली या मागास जिल्हयांसाठी वरील आदेशान्वये **रू.४२,०१,००,०००/- (रुपये बेचाळीस कोटी एक लक्ष फक्त)** एवढा प्रथम हप्त्याचा निधी राज्यास मंजूर करुन उपलब्ध करुन दिलेला आहे. उपलब्ध निधीमध्ये अनुसूचित जाती प्रवर्गासाठी **रु ४,८७,००,०००/- (रुपये चार कोटी सत्याऐंशी लक्ष फक्त)** एवढा निधी, अनुसूचित जमातीसाठी **रु. ८,४५,००,०००/- (रुपये आठ कोटी पंचेचाळीस लक्ष फक्त)** एवढा निधी तर सर्वसाधारणसाठी **रु. २८,६९,००,०००/- (रुपये अठठाविस कोटी एकोणसत्तर लक्ष फक्त)** एवढया निधीचा समावेश आहे.

२. मागास क्षेत्र अनुदान निधी या योजनेच्या मार्गदर्शक सुचनांनुसार केंद्र शासनाने मंजूर केलेल्या एकुण निधीपैकी ५% एवढा निधी जिल्हा परीषद/पंचायत समिती / ग्राम पंचायत स्तरावरील प्रकल्प व्यवस्थापनाचा खर्च भागविण्यासाठी वापरता येवु शकेल व उर्वरित ९५% एवढा निधी जिल्हा नियोजन समितीमार्फत मंजुर जिल्हा आराखडयामध्ये प्रस्तावित केल्यानुसार ग्रामीण व नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या विकास कामांवर खर्च करणे आवश्यक आहे.

३. त्यानुसार मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेंतर्गत केंद्राकडून प्राप्त झालेला **रू.४२,०१,००,०००/- (रुपये बेचाळीस कोटी एक लक्ष फक्त)** निधीपैकी या शासन निर्णयासोबत जोडण्यात आलेल्या विवरणपत्रातील रकाना ११ मध्ये दर्शविल्यानुसार **५% प्रमाणे रु.२,१०,०५,०००/- (रुपये दोन कोटी दहा लक्ष पाच हजार फक्त)** एवढा निधी प्रकल्प व्यवस्थापनाचा खर्च भागविण्यासाठी तर रकाना क्रमांक १२ मध्ये दर्शविल्यानुसार **९५% प्रमाणे**

**रु.३९,९०,९५,०००/- (रुपये एकोणचाळीस कोटी नव्वद लक्ष पंच्याण्णव हजार फक्त)** एवढा निधी जिल्हा विकास कामांसाठी या शासन निर्णयान्वये संबंधीत जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचे अधिनस्त अर्थसंकल्पीय प्रणालीद्वारे वितरित करण्यात येत आहे.

४. जिल्हा आराखडयामध्ये प्रस्तावित केलेल्या प्रमाणात ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थाचा निधी हा मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांचे अधिनस्त ठेवण्यात यावा, ते या निधीच्याबाबतीत नियंत्रक अधिकारी राहतील. उर्वरीत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निधीच्या बाबतीत संबंधित जिल्हयांचे जिल्हाधिकारी हे नियंत्रक अधिकारी राहतील. नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांचा निधी संबंधित जिल्हयांचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा यांनी संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांना वितरीत करावा. हा निधी मागास क्षेत्र अनुदान निधी योजनेच्या मार्गदर्शक सूचनांनुसार व शासनाकडून मंजूर करण्यात आलेल्या आराखडयातील योजनांवर / कामांवर खर्च करण्याची खबरदारी उपरोक्त दोन्ही नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी. या संबंधीची सर्वस्वी जबाबदारी नियंत्रक अधिकारी म्हणून मुख्य कार्यकारी अधिकारी व जिल्हाधिकारी यांची राहील.

५. उपरोक्त निधी मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद तथा अध्यक्ष, कार्यकारी समिती, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, यांना प्राप्त झाल्यापासून कोणत्याही परिस्थितीत १५ दिवसाच्या आत संबंधित अंमलबजावणी यंत्रणेस (ग्रामपंचायत/महानगरपालिका/नगरपरिषद) वितरीत करण्याविषयी पंचायत राज मंत्रालय, भारत सरकार यांच्या स्पष्ट सूचना आहेत. त्या अनुषंगाने संबंधित नियंत्रक अधिकारी यांनी उपरोक्त मुदतीत अंमलबजावणी यंत्रणेस निधी वितरण करण्याची दक्षता घ्यावी.

६. नियंत्रक अधिका-यांनी झालेल्या/होणा-या खर्चाचा आढावा घेऊन महालेखापाल कार्यालयाच्या नोंदीशी ताळमेळ घेवून प्रत्यक्ष खर्च व महालेखापाल कार्यालयात नोंद झालेला खर्च यामध्ये तफावत राहणार नाही याबाबत दक्षता घ्यावी आणि खर्चाच्या ताळमेळाचा दर तिमाही अहवाल विहीत मुदतीत सादर करावा. याशिवाय या योजनेच्या मासिक खर्चाचा अहवाल दरमहा १० तारखेपूर्वी शासनास पाठवावा. तसेच सदर अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र महालेखापालांना सादर करावे व त्याची एक प्रत शासनास पाठवावी. सदर निधीचे १००%

उपयोगिता प्रमाणपत्र दिनांक ३० डिसेंबर, २०११ पुर्वी पाठविणे आवश्यक आहे. उपयोगिता प्रमाणपत्रा अभावी पुढील निधी वितरण करता येणार नाही.

७. सदरहू खर्च "मागणी क्र.- एल -३ -२५१५ - इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १०२- सामूहिक विकास, केंद्र पुरस्कृत योजना, (०१) (०१), राष्ट्रीय सम विकास योजना/मागास भागासाठी अनुदान निधी योजना, (२५१५०४९२)(योजनांतर्गत/दत्तमत), ३१-सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षाखाली सन २०११-१२ या आर्थिक वर्षासाठी अर्थसंकल्पीय प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदी मधून भागविण्यात यावा.

८. सदर निधी वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.संक्र. ३९९/व्यय-१५, दिनांक- २/११/२०११ अन्वये दिलेल्या सहमतीने वितरीत करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०१११११०४१०२९५६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(उज्वला अ.रणसिंग)**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन**

प्रत-

१. विभागीय आयुक्त औरंगाबाद, अमरावती, नागपूर.
२. जिल्हाधिकारी औरंगाबाद, यवतमाळ व गडचिरोली
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, औरंगाबाद, यवतमाळ व गडचिरोली
४. जिल्हा नियोजन अधिकारी, औरंगाबाद, यवतमाळ व गडचिरोली
५. प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, औरंगाबाद, यवतमाळ व गडचिरोली
६. जिल्हा कोषागार अधिकारी , औरंगाबाद, यवतमाळ व गडचिरोली
७. जिल्हा परिषदांचे वित्त व लेखा अधिकारी, औरंगाबाद, यवतमाळ व गडचिरोली
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षा), मुंबई.
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
११. महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरीक्षा), नागपूर.
१२. संचालक लेखा व कोषागारे, नवीन प्रशासन भवन, मुंबई.
१३. महालेखापाल, (लेखापरीखा व लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-१
१४.मुख्य लेखा परीक्षण (स्थानिक निधी लेखा)ख कोकण भवन, नवी मुंबई.
१५.वित्त विभाग, अर्थसंकल्प-१७/ व्यय-१५/ अर्थोपाय, मंत्रालय, मुंबई.
१६.नियोजन विभाग,कार्यासन १४१४, १४४४, मंत्रालय, मुंबई.
१७.कार्यासन ग्रमांक वित्त-१/वित्त-७/योजना-७, ग्राम विकास व जलसंधारण,मंत्रालय,मुंबई.
१८.निवडनस्ती कार्यासन क्रमांक परा-६, ग्राम विकास व जलसंधारण,मंत्रालय,मुंबई.

शासन निर्णय क्रमांक :बीआरजीएफ-२०११/प्र.क्र.९४/पंरा-६, दिनांक ४.११.२०११ , (अनुदान वितरण आदेश क्र.७) (रुपयात)

सन २०११-२०१२ या आर्थिक वर्षात मागास क्षेत्र अनुदान निधी (BRGF) योजनेसाठी केंद्र शासनाकडून प्राप्त झालेल्या प्रथम हप्त्याचे अनुदान विवरण

| अ.क्र | जिल्हयाचे नांव | वार्षिक तरतूद | | | एकुण तरतुद (३+४+५) | सन २०११-२०१२ साठी केंद्र शासनाकडून पहिला हप्त्याचा प्राप्त निधी | | | केंद्र शासनाकडून प्राप्त झालेला एकुण निधी (७+८+९) | व्यवस्थापन खर्चासाठी वापरावयाचा ५ % निधी (रकाना १० च्या ५% प्रमाणे) | BRGF योजनेंतर्गत विकास कामासाठी वापरावयाचा एकूण ९५% निधी | या शासन निर्णयान्वये वितरित करावयाचा एकुण निधी |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | अनु.जाती | अनु.जमाती | सर्वसाधारण | | अनु.जाती | अनु.जमाती | सर्वसाधारण | | | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ |
| १ | औरंगाबाद | ३३९००००० | ९०००००० | २१७९००००० | २६०८००००० | २०१००००० | ५४००००० | १२९२००००० | १५४७००००० | ७७३५००० | १४६९६५००० | १५४७००००० |
| २ | यवतमाळ | २८५००००० | ५३४००००० | १९५३००००० | २७७२००००० | १२२००००० | २२९००००० | ८३७००००० | ११८८००००० | ५९४०००० | ११२८६०००० | ११८८००००० |
| ३ | गडचिरोली | २७४००००० | ९३७००००० | १२३४००००० | २४४५००००० | १६४००००० | ५६२००००० | ७४०००००० | १४६६००००० | ७३३०००० | १३९२७०००० | १४६६००००० |
| एकुण | | ८९८००००० | १५६१००००० | ५३६६००००० | ७८२५००००० | ४८७००००० | ८४५००००० | २८६९००००० | ४२०१००००० | २१००५००० | ३९९०९५००० | ४२०१००००० |

(उज्वला अ.रणसिंग)

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन